आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थपनेवरील उपायुक्त, समाज कल्याण, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन २०१८ मधील विनंती / प्रशासकीय बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ - २०१८/प्र.क्र. १९२/ आस्था-२**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ सप्टेंबर, २०१८

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम - ४ मधील तरतुदीनुसार समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या उपायुक्त, समाज कल्याण व तत्सम, गट-अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने विनंती / प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.सिद्धार्थ गायकवाड | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, भंडारा | प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, नागपूर | प्रशासकीय कारणास्तव |

२. श्री.धारगावे, उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, गोंदिया यांचेकडे उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, भंडारा या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन आदेशान्वये अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियमित पदाचा कार्यभार सांभाळून त्यांच्याकडे सोपविलेला अतिरिक्त कार्यभार सांभाळावा.

३. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे-

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास बदली झालेल्या पदावर रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

२. बदली झालेला अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यावर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल.

३. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०६१५१७३८५९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2018.09.06 15:18:47 +05'30'

**( ज्ञा.ल.सुळ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
३) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
४) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण , संस्था पुणे
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
६) सर्व अध्यक्ष, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९) मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
१०) मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
११) सचिव (सा. न्या. व वि. स. विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक मंत्रालय मुंबई
१२) निवडनस्ती आस्था-२.